चुकीच्या नोंदीचे प्रस्ताव महालेखापाल
कार्यालयाला सादर करण्याच्या
कार्यपध्दतीबाबत.

महाराष्ट्र शासन,
परिपत्रक वित्त विभाग क्र. खर्चमेळ-१०.०२/प्र.क्र. २९३/२००२/लोलेस,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ६ सप्टेंबर ,२००२.

वाचा :- १) परिपत्रक वित्त विभाग क्र. खर्चमेळ-१०.०१/प्र.क्र.१५/लोलेस,
दिनांक ३ फेब्रुवारी,२००१ .
२) परिपत्रक वित्त विभाग क्र. खर्चमेळ-१०.०१/प्र.क्र.२९३/लोलेस,
दिनांक २४ ऑक्टोबर २००१.
३) महालेखापाल (लेखा व हकदारी )-२, महाराष्ट्र, नागपूर यांचे
क्र. लेक/ एएसी/ विनि. लेखे/ २००१-२००२, दिनांकरहित
चे पत्र.

## परिपत्रक

प्रत्यक्ष खर्चाचे आकडे संबंधित वित्तीय वर्षात प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ६ महिन्यांच्या आत चुकीच्या नोंदीचे प्रस्ताव महालेखापाल कार्यालयाला पाठविण्यात यावेत अशा सूचना शासनाने तसेच महालेखापाल कार्यालयाने यापूर्वीच निर्गमित केलेल्या आहेत. त्यानुसार सन २००१-२००२ वर्षाच्या विनियोजन लेख्याबाबत चुकीच्या नोंदीचे प्रस्ताव महालेखापाल कार्यालयाला सादर करण्याचा अंतिम दिनांक २८ फेब्रुवारी २००३ पर्यन्त आहे.

चुकीच्या नोंदीचे प्रस्ताव महालेखापाल कार्यालयाला सादर करण्याच्या कार्यपध्दतीबाबतचे काही मुद्दे पुन्हा महालेखापाल, नागपूर यांनी खाली नमूद केलेले आहेत. :-

१) चुकीच्या नोंदीचे प्रत्येक प्रस्ताव मंत्रालयीन संबंधित प्रशासकीय विभागामार्फत ( विहित मुदतीत) संबंधित महालेखापाल कार्यालयाला पाठविणे आवश्यक आहे.

२) चुकीच्या नोंदीच्या प्रस्तावामध्ये पूर्ण रक्कमेचा उल्लेख करावा.
उदा. लाख, कोटी , हजारांत पूर्ण करु नये (Roundup ).

३) सदर प्रस्तावाच्या समर्थनासाठी खर्चमेळासंदर्भातील विवरणपत्राच्या प्रमाणित केलेल्या प्रपत्राच्या . प्रतीदेखील पाठविणे आवश्यक आहे.

४) चुकीच्या नोंदीच्या प्रस्तावाच्या विवरणपत्रामधील वर्गीकरण अंदाजपत्रकानुसार करावे.
उदा. क्रमांक, मुख्य लेखाशीर्ष/उपलेखाशीर्ष /गौण लेखाशीर्ष /उपशीर्ष /उद्दीष्ट, योजनांतर्गत/योजनेतर, दत्तमत किंवा भारित, संगणक कोड क्रमांक इत्यादी माहिती ,

५) चुकीच्या नोंदीच्या ज्या प्रस्तावामध्ये एकापेक्षा अधिक विभागीय कार्यालये यांचा संबंध आहे, अशा प्रस्तावाबाबत संबंधित विभागांची सहमती घेऊनच प्रशासकीय विभागाने प्रस्ताव महालेखापाल कार्यालयाला पाठवावेत.

६) सन २००१-२००२ वर्षाच्या विनियोजन लेख्यावाबत चुकीच्या नोंदीचे प्रस्ताव दिनांक २८ फेब्रुवारी २००३ च्या आत महालेखापाल कार्यालयाला पाठवून त्यांच्याकडून मंजूर करुन घेण्याची दक्षता घ्यावी. उपरोक्त तारखेनंतर पाठविलेले चुकीच्या नोंदीचे प्रस्ताव महालेखापाल कार्यालयाकडून स्वीकृत केले जाणार नाहीत.

(कृ.मा.प.

महालेखापालांनी दिलेल्या उपरोक्त सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे व प्रशासकीय विभागांनी सदर सूचना त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुखांच्या निदर्शनास आणाव्यात.

( वि. य. तायशेटे )
अवर सचिव,वित्त विभाग.

प्रत,

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०० ०२०,
२) महालेखापाल (लेखापरीक्षा) -१,महाराष्ट्र, मुंबई- ४०० ०२०.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२,महाराष्ट्र, नागपूर,
४) महालेखापाल (लेखापरीक्षा )-२, महाराष्ट्र, नागपूर,
५) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई,
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
८) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
९) राज्यपालांचे सचिव,
१०) मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव,
११) उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
१२) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
* १३) प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
* १४) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* १५) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* १६) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* १७) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई.
* १८) प्रमुख न्यायाधीश , कुटुंब न्यायालय, नागपूर /मुंबई,वांद्रे, मुंबई- ४०० ०५१.
१९) उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/
औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
२०) उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग,
२१) कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
२२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२३) सर्व उप कोषागार अधिकारी,
२४) मंत्रालयाच्या सर्व प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख,
२५) प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख,
२६) मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभाग,
२७) सर्व विभागीय आयुक्त,
२८) सर्व जिल्हाधिकारी,
२९) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
३०) सर्व जिल्हा परिषदांच्या सर्व विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
३१) निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली-११० ००१
३२) वित्त विभागातील सर्व अधिकारी,
३३) निवड नस्ती, सेवा-४, वित्त विभाग.

---

* २ प्रती.

[illegible]